**स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि.०२.०१.२०१६ रोजी प्रसिद्ध केलेल्या अंतिम ज्येष्ठता सूची संदर्भातील दि.१५.०७.२०१७ रोजीच्या शुद्धीपत्रकाबाबतचे सुधारीत शुद्धीपत्रक**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांक - ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१,**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,**
**दिनांक -११.१०.२०१८**

**वाचा**-१) शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१, दि.०२.०१.२०१६.

२) शासन शुद्धीपत्रक क्र. सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१, दि.१५.०७.२०१७.

**शुद्धीपत्रक -**

संदर्भाधीन १ येथील शासन परिपत्रक दि.०२.०१.२०१६ अन्वये स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाची दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१४ या कालावधीतील अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर परिपत्रकान्वये ज्येष्ठता सूचीतील समावेशनाबाबतचे नियमाधीन निकष स्पष्ट करण्यात आले आहेत. तद्‌नंतर सदर ज्येष्ठता सूचीच्या अनुषंगाने प्राप्त आक्षेप / निवेदने यांचे अवलोकन करुन दि.१५.०७.२०१७ रोजी शासन शुद्धीपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.

२. तथापि, सदर शासन शुद्धीपत्रकाचे अवलोकन केले असता, सदर शुद्धीपत्रकामध्ये काही त्रुटी असल्याचे निदर्शनास आले आहे.

दि.१५.०७.२०१७ रोजीच्या शुद्धीपत्रकान्वये अनु.क्र.७१ वरील श्री.आर.डी.काळे यांना अ.क्र.१३४३-अ या ज्येष्ठता क्रमांकावरती स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या ज्येष्ठता सूचीमध्ये नव्याने समाविष्ट करण्यात आले आहे. तसेच अ.क्र.११२ वरील श्री.एम.एम.यमनुरवार यांची ज्येष्ठता क्रमांक २१७३ वरील नोंद वगळून त्यांनाही अ.क्र.१३४३-अ हा ज्येष्ठतेचा अनुक्रमांक देण्यात आला आहे. म्हणजेच दोन स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना एकच ज्येष्ठतेचा अनुक्रमांक देण्यात आला आहे. यानुषंगाने सदर दोन्ही स्था.अ.सहायकांच्या वैयक्तिक व सेवाविषयक तपशीलाचे अवलोकन करण्यात आले असता, सदर स्था.अ.सहायकांना त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी पदावर समावेशन करण्यात आलेल्या दिनांकानुसार ज्येष्ठतेचा मानीव दिनांक देण्यात आलेला आहे. श्री. आर. डी.काळे यांचे दि.१३.०४.२०१७ रोजी स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर समावेशन करण्यात आले आहे. श्री. एम.एम. यमनुरवार यांचे दि.१६.०४.२०१७ रोजी स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर समावेशन करण्यात आले आहे. **सबब, समावेशनाच्या दिनांकानुसार श्री. काळे हे श्री. यमनुरवार यांना ज्येष्ठ असल्याने श्री. काळे व यमनुरवार यांना अनुक्रमे १३४३-अ व १३४३-ब असा ज्येष्ठतेचा अनुक्रमांक देण्यात येत आहे**.

३. श्री.डी.के.बोडके यांना शासन शुद्धीपत्रक दि.१५.०८.२०१७ अन्वये १७४६-अ असा सुधारीत ज्येष्ठता क्रमांक देण्यात आला आहे. तथापि, शेरा रकान्यात ज्येष्ठता सूचीमध्ये अ.क्र.१४७६-अ वरती नव्याने समावेश करण्यात येत आहे असे नमूद आहे. त्यामुळे श्री. बोडके यांना नेमका कोणता ज्येष्ठता अ.क्र. देण्यात आला आहे, याबाबत संदर्भ क्र. १ येथील ज्येष्ठता सूचीचे अवलोकन केले असता श्री.डी.के.बोडके यांची सरळसेवेने स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या पदावर दि.०९.०८.२००८ रोजी नियुक्ती झालेली आहे. त्यांच्या नियुक्तीचा दिनांक हा ज्येष्ठतेचा दिनांक देण्यात आला आहे. **सबब, श्री. बोडके यांना शासन शुद्धीपत्रकान्वये देण्यात आलेला क्रमांक १७४६-अ हा सुयोग्य आहे. रकान्यात नमूद करण्यात आलेला क्र.१४७६-अ हा पाठभेद (Typing Mistake) आहे. उपरोक्त परिस्थितीत श्री.बोडके यांचा ज्येष्ठतेचा दिनांक १७४६-अ हा समजण्यात यावा.**

४. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१०१११२३५४५४६१८ असा आहे. सदरहू आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e604684d5ae3908b43f3994a5d621ae70aea823677742131dbe7e69348f436, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2018.10.11 12:37:41 +05'30'

**(वि.नि.ढमाळ)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंते (स्था), सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य
२. सर्व अधीक्षक अभियंते (स्था), सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य

यांना विनंती करण्यात येते की, सदरहू शासन परिपत्रक आपल्या अधिपत्याखालील सर्व स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या निदर्शनास आणून देण्यात यावे.

३. प्रधान सचिव, सा.बां.वि, मंत्रालय, मुंबई.
४. कक्ष अधिकारी, आस्था-३, सेवा-२ व संगणक कक्ष, सा.बां.वि., मंत्रालय, मुंबई.
५. निवडनस्ती.